राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठात जागतिक दर्जाचे आंतर क्रिडा संकुल उभारण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.७२/विशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२३.

वाचा :- १. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ यांचे दि.१५.०२.२०२३ रोजीचे पत्र.
२. विभागाचा समक्रमांकाचा दि.१३.०३.२०२३ रोजीचा शासन निर्णय.

प्रस्तावना :-

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर विद्यापीठाची स्थापना ४ ऑगस्ट १९२३ झाली. विद्यापीठाचा परिसर ३७३ एकर मध्ये पसरलेला आहे. मध्य भारतातील सर्वात जुने विद्यापीठ म्हणून नावलौकिक असलेल्या विद्यापीठाने शंभराव्या वर्षात पदार्पण केले आहे. त्यामुळे सन २०२२-२३ हे शैक्षणिक वर्ष शताब्दी महोत्सवी वर्ष म्हणून साजरे केले जाणार आहे. त्यानिमित्ताने विद्यापीठाच्या अंगीकृत ज्ञाननिर्मिती आणि कौशल्यनिर्मिती बरोबरच विद्यापीठाच्या परिक्षेत्रातील जनसमुहाच्या भौतिक गरजा आणि भविष्यातील विकासाच्या शक्यतांचा वेध घेऊन विद्यापीठाने काही नवीन प्रकल्पांची उभारणी करण्यास सुरुवात केली आहे.

विद्यापीठाने जागतिक स्तरावरील आव्हाने आणि संधी यांची सांगड घालीत आवश्यकतेनुसार धोरणे आखली आहेत. तद्नुषंगाने विद्यापीठाने जागतिक दर्जाचे आंतर क्रिडा संकुल उभारण्याचे प्रस्तावित केले असुन, यामध्ये विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांचा राष्ट्रीय आंतरराष्ट्रीय क्रिडा स्पर्धामध्ये सहभाग वाढावा तसेच शाळा व इतर संस्था, व्यक्ती यांना सुध्दा संकुलाचा लाभ व्हावा या दृष्टीने क्रिडा संकुलाचे बांधकाम प्रस्तावित केले होते. तद्नुषंगाने या कामाच्या रु.४४४१.३८ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास वाचा क्र.२ येथील दि.१३.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदरहू प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन निधी उपलब्ध करुन देण्याची संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने आंतर क्रिडा संकुल उभारण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठात जागतिक दर्जाचे आंतर क्रिडा संकुल उभारण्याकरीता रु.२०,००,००,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) इतका निधी खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. हा निधी प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच वितरीत तथा आहरीत करण्यात यावा.

२. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

३. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

४. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

५. वरील कामाचा प्रगती अहवाल वेळोवेळी शासनास सादर करण्यात यावा. त्यानुसार कामाची प्रगती विचारात घेऊन पुढील निधी वितरीत करण्यात येईल.

२. सदरहू मंजूर झालेली तरतुद राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" वेतनेत्तर सन २०२२-२०२३ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२२, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०३३०१३४९२४५००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.03.30 13:53:32 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७. सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर
९. अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर.
१०.नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८/१२) मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
१३.उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
१४.अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.